महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील पदव्युत्तर पदवी अर्हताधारक "वैद्यकीय अधिकारी" यांना "जिल्हा शल्य चिकित्सक " संवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन आदेश क्रमांकः पदोन्न-१११९/प्र.क्र.३०७/सेवा-२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार संकुल इमारत १० वा मजला
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक : २२ एप्रिल, २०२२

**वाचा-**१. शासन निर्णय, सा. प्र. विभाग क्र. एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/कार्या-१२, दि.०१.०८.२०१९.
२. शासन आदेश, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.पदोन्न-१११९/प्र.क्र.३०७/सेवा-२, दि.१५.०९.२०२०.
३. शासन आदेश, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.पदोन्न-१११९/प्र.क्र.३०७/सेवा-२, दि.२१.०९.२०२०.
४. शासन आदेश, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.पदोन्न-१११९/प्र.क्र.३०७/सेवा-२, दि.०९.१२.२०२०.

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील (वेतनस्तर एस-२० : ५६१००-१७७५००) पदव्युत्तर पदवी अर्हताधारक वैद्यकीय अधिकारी यांना महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतन स्तर एस-२३ : ६७७००-२०८७००) मधील "जिल्हा शल्य चिकित्सक" संवर्गातील पदावर या आदेशाद्वारे विहित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून, पदोन्नती कोट्यातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. प्रस्तुत पदोन्नतीनंतर संबंधीत अधिकाऱ्यांची पदस्थापना खालील विवरणपत्रामधील "स्तंभ-४" मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ. क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्याचे नाव व सध्याची पदस्थापना | मूळ प्रवर्ग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | डॉ. कमलकुमारी भिकाराम चौधरी, वैद्यकीय अधिकारी, मध्यवर्ती रूग्णालय, उल्हासनगर-३. | खुला | वैद्यकीय अधीक्षक, उपजिल्हा रूग्णालय, नवापूर, जि. नंदुरबार. (रिक्त पदी) |
| २. | डॉ. तानाजी ज्ञानोबा लाकाळ, वैद्यकीय अधिकारी, जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद. | खुला | अतिरिक्त जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद. (रिक्त पदी) |
| ३. | डॉ. राजकुमार रामलाल कोरटी, वैद्यकीय अधिकारी, जिल्हा रूग्णालय, गडचिरोली. | अ.ज. | वैद्यकीय अधीक्षक, उपजिल्हा रूग्णालय, आरमोरी, जि. गडचिरोली (रिक्त पदी) |
| ४. | डॉ. विरेंद्र लिंबराज गवळी, वैद्यकीय अधिकारी, जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद. | खुला | वैद्यकीय अधीक्षक, ग्रामीण रूग्णालय, पांगरी, ता. बार्शी, जि. सोलापूर. (रिक्त पदी) |

२. सदर पदोन्नती महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील “जिल्हा शल्य चिकित्सक” या संवर्गातील पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार देण्यात येत आहे.

३. मा. उच्च न्यायालयाने पदोन्नतीचे आरक्षण रद्द करण्यासंदर्भातील याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरूद्ध राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केलेली आहे. त्यानुसार सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात मा. सर्वोच्च न्यायालयाच्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

४. सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

५. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात असून सदर पदावर संबंधितांचा कायमस्वरूपी धारणाधिकार राहणार नाही. तसेच सदर पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यास नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

६. सदर पदोन्नतीने देण्यात आलेली पदस्थापना ही “महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूल विभाग वाटप नियम, २०२१” मधील तरतुदीनुसार देण्यात आलेली आहे.

७. पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी पदोन्नतीनंतर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतन निश्चितीचा विकल्प द्यावा, असा विकल्प न दिल्यास त्यांची वेतन निश्चिती, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११(१)(ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

८. संबंधित अधिकाऱ्यांना त्यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेवर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी **एक महिन्याच्या** आत हजर होऊन, त्याबाबतचा अहवाल १) उप सचिव (सेवा-२), सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई, २) संचालक, आरोग्य सेवा(१), मुंबई व ३)संबंधीत उपसंचालक, आरोग्य सेवा यांना सादर करावा. पदस्थापना बदलून घेण्यासाठी राजकीय दबाव आणल्यास सदर कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील तरतूदीनुसार शिस्तभंग विषयक कारवाईस पात्र ठरेल.

९. पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेवर विहित मुदतीत हजर व्हावे. जे अधिकारी विहित मुदतीत पदोन्त्तीवर हजर होणार नाहीत ते पदोन्नतीस इच्छुक नाहीत असे गृहीत धरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच त्यांना देण्यात आलेला आश्वासीत प्रगती योजनेचा लाभ काढून घेण्यात येईल. तसेच, अधिकाऱ्यांनी पदोन्नती न स्विकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

या प्रकरणी संबंधीत उपसंचालक, आरोग्य सेवा यानी संबंधीत अधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी वेळीच हजर होतात किंवा नाही याबाबतचा अनुपालन अहवाल विहित कालमर्यादेत शासनास सादर करावा.

१०. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२२१४५५३८१६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chandrakant Haridas Wade

Digitally signed by Chandrakant Haridas Wade
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd8189 3480c90bedd57685ea1ce3af533f64bce, serialNumber=9474e7143b2bc3fd96e8d7bf07d 1ce51de8461d4c34ae1e3f643c11b54523936, cn=Chandrakant Haridas Wade
Date: 2022.04.22 17:22:00 +05'30'

( चंद्रकांत ह. वडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, महाराष्ट्र लोक सेवा आयोग, मुंबई (पत्राने)
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा (२), पुणे.
५. सह संचालक, आरोग्य सेवा (अ. व प्र.) मुंबई
६. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, ठाणे / नाशिक/ नागपूर/ लातूर/ पुणे.
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
९. जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रूग्णालय, नंदुरबार / गडचिरोली/ उस्मानाबाद/ सोलापूर
१०. जिल्हा शल्यचिकित्सक, मध्यवर्ती रूग्णालय, उल्हासनगर-३.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/ नंदुरबार / गडचिरोली/ उस्मानाबाद/ सोलापूर
१२. मा. मंत्री (आरोग्य)/ मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१३. अपर मुख्य सचिव, सा. आ. विभाग, मंत्रालय यांचे स्विय सहायक
१४. प्रधान सचिव (२), सा. आ. विभाग, मंत्रालय यांचे स्विय सहायक
१५. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१२ व १६-ब, मंत्रालय, मुंबई
१६. सह सचिव (सेवा-३), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

१७. अवर सचिव (सेवा-३), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१८.सर्व संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई यांचे मार्फत)
१९.निवडनस्ती सेवा-२